राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम
निधी वितरण- सन २०१४-१५ (TSP)

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः तंनिका-२०१५/निधी वितरण/प्र.क्र.२०/आरोग्य-५

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, १० वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख : १६ मार्च , २०१५

वाचा -

**१) संचालक (वित्त), आरोग्य आणि कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र No. G.२५०१२/५/२००९/NRHM Finance, दि.१० फेब्रुवारी, २०१४.**

**२) केंद्र शासनाच्या आरोग्य आणि कुटुंब कल्याण मंत्रालयाचे आदेश F.No.P.१६०१२/२२/२०१४-PH-I(FTS-१०३५८८/२०१४) दि.२८ ऑक्टोबर, २०१४.**

**३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. प्रशामा/प्र.क्र.३०६/आरोग्य-५, दि.१६ जानेवारी, २०१५.**

**४) सहसंचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/NCD/नस्ती क्र.२६/हिस्सा ७७-८२/१५, दि.१६ जानेवारी, २०१५.**

प्रस्तावना -

राष्ट्रीय तंबाखु नियंत्रण कार्यक्रम हा केंद्र पुरस्कृत कार्यक्रम असून, या कार्यक्रमासाठी अनुदानाचे प्रमाण, केंद्र शासन ७५% हिस्सा व राज्य शासन २५% हिस्सा असे आहे. या कार्यक्रमास मागील वित्तीय वर्षापर्यंत केंद्र शासनाकडून प्राप्त होणारा निधी थेट कार्यक्रम अंमलबजावणी अधिकाऱ्यांना वितरीत केला जात होता. केंद्र शासनाने वरील संदर्भ क्र.१ येथे नमुद दि.१०.०२.२०१४ च्या पत्रान्वये राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्ग राबविण्यात येणाऱ्या कार्यक्रमांना सन २०१४-१५ या आर्थिक वर्षापासून दिला जाणारा निधी राज्याच्या एकत्रित निधीद्वारे वितरीत करण्याच्या सुचना दिल्या आहे. या कार्यक्रमासाठी केंद्र शासनाकडून उपलब्ध होणारा निधी (१) सर्वसाधारण निधी (General) (२) अनुसूचित जाती क्षेत्राकरिता (Schedule Cast Plan) (३) आदिवासी क्षेत्राकरिता (Tribal Area Sub Plan), अशा तीन वेगवेगळया उप योजनांकरिता दिला जातो. सदर अनुदान राज्याच्या एकत्रित निधीद्वारे निधी उपलब्ध करुन देण्यासाठी सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत तीनही उपयोजनांसाठी केंद्र हिस्सा व राज्य हिश्श्याची रक्कम वितरणासाठी स्वतंत्र लेखाशिर्षे उघडण्यात आली आहेत. तसेच सदर लेखाशिर्षांतर्गत आर्थिक तरतूद देखिल करण्यात आलेली आहेत. राष्ट्रीय तंबाखु नियंत्रण कार्यक्रमासाठी केंद्र शासनाने पहिल्या टप्प्यात आदेश क्र.F.No.P.१६०१२/२२/२०१४-PH-I(FTS-१०३५८८/२०१४) दि.२८ ऑक्टोबर, २०१४ अन्वये आदिवासी क्षेत्राकरिता (Tribal Area Sub Plan) रु. २.७९ लक्ष इतका निधी राज्यास वितरीत केला आहे. सदर निधी कार्यक्रम अंमलबजावणी अधिकाऱ्यास वितरीत करण्याची शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

केंद्र शासनाचे आदेश क्र.F.No.P.१६०१२/२२/२०१४-PH-I(FTS-१०३५८८/२०१४) दि.२८ ऑक्टोबर, २०१४ अन्वये राष्ट्रीय तंबाखु नियंत्रण कार्यक्रमांतर्गत आदिवासी क्षेत्राकरिता (Tribal Area Sub Plan) राज्यास प्राप्त झालेले रु. २.७९ लक्ष इतका निधी कार्यक्रम अंमलबजावणीसाठी वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

सदर निधी राज्यातील ज्या जिल्ह्यांत राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम राबविला जातो त्या त्या जिल्हयातील आदिवासी क्षेत्रात कार्यक्रम अंमलबजावणीसाठी खर्च करण्यात यावा.

सदरचा खर्च खालील दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. टी- १ (आदिवासी विकास विभाग),
२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
०६ - सार्वजनिक आरोग्य,
७९६ - जनजाती क्षेत्र उपयोजना
केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा)
(०१) (२७) राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम (रातंनिका)
(२२१० एफ ८३६)
३१ सहाय्यक अनुदाने

राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रमांतर्गत वितरीत केलेल्या निधीचा ताळमेळ राखण्यासाठी सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सदर अनुदानाशी संबंधीत देयके अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर निधीशी संबंधीत देयक कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी रक्कम संबंधीत कार्यक्रम अंमलबजावणी अधिकाऱ्यांकडे सुपूर्द करावी.

सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभाग व्यय-१४, अर्थोपाय शाखेच्या सहमतीने त्यांचा अनौपचारीक संदर्भ क्र.७३/२०१५/व्यय-१३, दि.२६/०२/२०१५ व क्र.३८७/२०१५/अर्थोपाय, दि.०३/०३/२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१११७१०५३६११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sul Dnyandeo L

Digitally signed by Sul Dnyandeo L
DN: CN = Sul Dnyandeo L, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2015.03.17 17:54:18 +05'30'

**(ज्ञा. ल. सुळ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.

२) महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
३) आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५) सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई.
६) सहसंचालक, आरोग्य सेवा (हि. ह. व ज. रो), पुणे-१/६.
७) प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) वित्त विभाग, (व्यय-१३) (अर्थसंकल्प-९)/(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१२) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा)/(लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती (आरोग्य-५).